**सिन्नर पंचायत समिती (जिल्हा नाशिक) प्रशासकीय इमारतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन.**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २००८/प्र.क्र.२४९/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :-३०जून,२००९

**संदर्भ** :- अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,नाशिक यांचे पत्र क्र.जिपना/बांखा/इवद-१/पीबी३/ २७६/२००९, दिनांक- ०१.०६.२००९

**प्रस्तावना** :-

अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांनी संदर्भीय दिनांक ०१.०६.२००९ च्या पत्रान्वये सिन्नर पंचायत समितीची प्रशासकीय इमारत अतिशय जुनी असून मोडकळीला आलेली असल्याने तसेच कर्मचाऱ्यांना बसण्यास जागा अपूरी पडत असल्याने, जुनी पंचायत समितीची इमारत पाडून त्या ठिकाणी नविन प्रशासकीय इमारत बांधण्याच्या प्रस्तावास मान्यता मिळण्याची विनंती केली आहे.

सिन्नर पंचायत समितीची अस्तित्वात असलेल्या इमारतीची जागा ही नाशिक जिल्हा परिषदेच्या मालकीची असून, जागेचे एकूण क्षेत्रफळ ७४००.३० चौ.मी. आहे. या इमारतीचे बांधकाम सन १९६९ मधील असून, सदर इमारतीचे क्षेत्रफळ ३७४ चौ.मी आहे. ही इमारत भारवाहक पाया पध्दतीने बांधण्यात आलेली असून मोडकळीस आलेली असल्याने सद्य:स्थितीत सदर कार्यालयीन इमारत वापरा योग्य नाही. तसेच लघु पाटबंधारे उपविभाग, एकात्मिक बाल विकास प्रकल्प, कृषि विभाग, बांधकाम विभाग, पशुवैद्यकीय विभाग इत्यादी कार्यालये लहान अशा निवास स्थानात, गोदामात भरविण्यात येत असून, सदर इमारती देखिल मोडकळीला आलेल्या आहेत. त्यामुळे वरील सर्व कार्यालये एकाच ठिकाणी बांधण्याच्या दृष्टीने अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नाशिक यांनी नविन इमारत बांधकामाचा प्रस्ताव सादर केलेला आहे. या एकूण १२३४ चौ.मी. क्षेत्रफळाचे बांधकाम प्रस्तावित करण्यात आले आहे. प्रस्तावित जागेत शासनाच्या मंजूर नकाशाप्रमाणे बांधकाम केल्यास, ज्यादा जागा व्यापली जावून बांधकामाचे उपयुक्त क्षेत्रफळ कमी मिळत असल्याने, मंजूर १२३४ चौ.मी. क्षेत्रफळाच्या मर्यादेत खाजगी वास्तुशास्त्रज्ञाकडून नकाशे तयार करुन शासनास सादर करण्यात आलेले आहेत. सदर बांधकामाकरीता रु. २३९.८५ लक्ष किंमतीचे सादर करण्यात आलेले अंदाजपत्रक शाखा अभियंता यांनी तयार केले असून, उपविभागीय अभियंता, जिल्हा परिषद उपविभाग, सिन्नर व कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, नाशिक-विभाग-१ यांनी साक्षांकित केले आहे. सदर प्रस्तावासोबत अस्तित्वातील कार्यालयीन इमारत मोडकळीस आल्याबाबतचे प्रमाणपत्र, जागेचा नकाशा, बांधकामाचा नकाशा, पंचायत समिती व जिल्हा परिषदेच्या सर्वसाधारण सभेच्या ठरावाच्या प्रती सादर करण्यात आलेल्या आहेत.

अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांनी केलेल्या तांत्रिक छानणी अंती, सिन्नर पंचायत समितीच्या रु.२,१०,९२,४००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## -: **शासन निर्णय** :-

सिन्नर (जिल्हा-नाशिक) पंचायत समितीची जूनी प्रशासकीय इमारत पाडून, त्या जागी नवीन प्रशासकीय इमारतीच्या एकूण रक्कम रुपये- २,१०,९२,४००/- (रुपये दोन कोटी दहा लक्ष ब्यान्नव हजार हजार चारशे फक्त) इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

(१) नियोजित सिन्नर पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीचे बांधकाम सुरु करण्यापूर्वी प्रस्तावित करण्यात आलेल्या आराखड्यास मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.वि., मुंबई यांची मान्यता घेणे बंधनकारक राहील.

(२) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.

(३) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रमा किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी. प्रमा किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

(४) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.

(५) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

२. सिन्नर पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे:-

**GENERAL ABSTRACT**

| Sr. | Work Details | Amount (in Rs.) |
|---|---|---|
| 1 | Cost of construction of Admn. Bldgs | 18665844.50 |
| 2 | Add contingencies @ 5% | 933292.00 |
| 3 | Add water supply and sanitation charges at 11% | 933292.00 |
| 4 | Add Electrification charges @ 7% | 559975.00 |
| | Total Rs. | 21092403.50 |
| | **Say Rs.** | **21092400.00** |

३. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल.

४. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५००५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर प्रस्तावाची तांत्रिक छाननी मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांच्यामार्फत करण्यात आली आहे.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ. क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

७. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र.**२००९०६३०१८१५५७००१** असाआहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

कृ.मा.प..

C:\DO\RRD\PARA7\BLDG PROPOSAL\PSH 2008-CR.249-Sinnr.doc

प्रत,
१) विभागीय आयुक्त नाशिक विभाग, नाशिक.
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नाशिक
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद नाशिक
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद नाशिक
६) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा नाशिक
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुबंई.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा लातूर विभाग, नाशिक
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नाशिक
१०) सभापती, पंचायत समिती, सिन्नर, जिल्हा नाशिक
११) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, सिन्नर, जिल्हा नाशिक
१२) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३) सार्वजनिक बांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१४)का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई